अपेडा प्राधिकृत कत्तलखान्याचे कामकाज
सनियंत्रित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. पविआ-१०२०/प्र.क्र.१४/पदुम-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :- १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.१४ जुलै,२०२०.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.२२ऑक्टोबर,२०२१.
३) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र समक्रमांक दि.१ डिसेंबर,२०२१.
४) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र समक्रमांक दि.२२ जानेवारी,२०२२.

प्रस्तावना :-

अपेडा अथवा केंद्र/राज्य शासनाच्या तत्सम प्राधिकरणाद्वारे प्राधिकृत असलेल्या राज्यातील अधिकृत कत्तलखान्यांमध्ये महाराष्ट्र प्राणी रक्षण अधिनियम (सुधारणा),१९९५ अंतर्गत अनुसूचित पशूंच्या कत्तलपूर्व तपासणी करण्याकरिता वाचा मधील अ.क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या निवड समितीकडून निवड करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यकांची नियुक्ती संबधित कत्तलखान्यांकडून करण्यात येते. तसेच वाचा मधील अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये दक्षता पथकाची स्थापना करण्यात आलेली आहे.

२. सदर कत्तलखान्यांमध्ये उक्त अधिनियमाच्या अनुसूचिमधील पशूंच्या कत्तलीपूर्वीची तपासणीची कार्यवाही योग्य पध्दतीने व नियमानुसार होत आहे किंवा कसे, त्याचप्रमाणे अशा ठिकाणी कोणतेही बेकायदेशीर कृत्य घडू नये यासाठी नियुक्त खाजगी पशुवैद्यकाच्या कामकाजावर संनियत्रण ठेवणे आवश्यक आहे. त्यासाठी आणखी काही बाबीं संदर्भात आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**३. शासन निर्णय :-**

वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, अपेडा प्राधिकृत कत्तलखान्यांमध्ये अनुसूचित पशूंची कत्तलपूर्व तपासणी करण्यासाठी नियुक्त केलेल्या खाजगी पशुवैद्यकांच्या कामकाजावर संनियंत्रण ठेवण्यासाठी तसेच वाचा मधील अ.क्र.४ येथील दिनांक २२ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या दक्षता पथकाने केलेल्या कामकाजाचा आढावा घेण्यासाठी खालीलप्रमाणे तपासणी पथक नियुक्त करण्यात येत आहे.

(१) तपासणी पथकाची संरचना :-

(i) संबधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन - अध्यक्ष
(ii) संबधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालयातील सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन - सदस्य
(iii) संबधित विभागातील विभागीय पशुरोग अन्वेषण प्रयोगशाळा कार्यालयातील सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन - सदस्य सचिव

(२) सदर तपासणी पथकाने एका महिन्यांतून किमान एकदा त्यांच्या कार्यकक्षेतील कत्तलखान्यास भेट देऊन नियुक्त केलेले पशुवैद्यक योग्य ती तपासणी करतात किंवा कसे, त्याचप्रमाणे जिल्हा दक्षता पथकाच्या कामकाजाचा आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांना सादर करावा.

४. **कत्तलपूर्व तपासणीमध्ये इनाफ प्रणालीचा अवलंब करणे** -

(i) कत्तलपूर्व तपासणी करण्यासाठी येणाऱ्या अनुसूचित पशुंची टॅगिंग आणि इनाफ (INAPH) प्रणाली अंतर्गत नोंदणी असल्याशिवाय सदर पशुंची कत्तलपूर्व तपासणी करण्यात येऊ नये.

(ii) कत्तलपूर्व तपासणी मध्ये सदर अनुसूचित पशु कत्तलीसाठी कायद्यातील सर्व निकषांतील पूर्तता करीत असल्याचे आढळून आल्यास, कत्तलपूर्व तपासणी प्रमाणपत्रावर टॅगची नोंद घेण्यात यावी.

(iii) कत्तलीपूर्वी पशुंना लावण्यात आलेला टॅग जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्या अध्यक्षतेखालील दक्षता पथकाकडे सोपविण्यात यावा आणि जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्या कार्यालयाकडून इनाफ प्रणालीवर आवश्यक त्या नोंदी घेण्याची कार्यवाही करणे अनिवार्य राहील.

(iv) टॅगिंग /इनाफ (INAPH) प्रणालीमध्ये नोंदणी केल्याशिवाय कत्तलपूर्व तपासणी होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. अन्यथा, संबधित कत्तलखान्याचे मालक/कत्तल खान्यावर नियुक्त करण्यात आलेले पशुवैद्यक यांच्याविरुध्द कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच्या संकेतांक २०२२०२१८१७०३३८९३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2022.02.18 17:05:19 +05'30'

**( विकास तु. कदम )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
६. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.
७. सर्व प्रादेशिक सह आयुक्त पशुसंवर्धन
८. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

१०.सर्व जिल्हा उप आयुक्त पशुसंवर्धन
११.सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१२.सर्व जिल्हा पशुवैद्यक सर्वचिकित्सालय
१३.प्रधान सचिव (पदुम) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२.
१४.निवड नस्ती (पदुम-३).